नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत. लाखांदूर (जिरोबा) ता.लाखांदूर जि.भंडारा (सन- २०२०-२१)

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०२०/ प्र.क्र.७२/नापु-१६-ब
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ ऑक्टोबर, २०२०.

<u>प्रस्तावना</u> :-

भंडारा जिल्ह्यातील लाखांदूर तालुक्यातील ९० टक्के लोकसंख्या ही धान शेतीवर अवलंबून आहे. लाखांदूर तालुक्यात १५०० मे.टन क्षमतेचे एक गोदाम आहे. त्यामुळे धान साठवणुकीकरिता कोणतीही व्यवस्था नसल्यामुळे अवकाळी पावसामुळे शेतकऱ्यांचे बहुतांश धान खराब होत असते. त्यामुळे लाखांदूर (जिरोबा) ता.लाखांदूर येथे १०८०० मे.टन (६ X १८००= १०८०० मे.टन) क्षमतेच्या गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून विभागास प्राप्त झाला आहे.

सदर गोदामाच्या अंदाजपत्रकास व बांधकामास सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक सहमती दिली आहे. तसेच प्रस्तावाची किंमत **₹ १५ कोटीपेक्षा** जास्त असल्यामुळे सदर प्रस्तावास मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने चक्रीय पध्दतीने मान्यता दिली आहे. सबब, शासकीय गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामास नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या प्रकल्पातंर्गत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

२. लाखांदूर (जिरोबा) ता.लाखांदूर जि.भंडारा येथील १०८०० मे.टन ( १८०० X ६ = १०८०० मे.टन) क्षमतेच्या गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर बांधकामासाठी लागणारा निधी संबंधित उपभोक्ता विभागाने उपलब्ध करून द्यावा.

II. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

III. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

IV. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. **<u>शासकीय गोदाम बांधकाम:-</u>**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | प्रस्तावित गोदामाचे ठिकाण | गोदाम संख्या | प्रस्तावित गोदामाची क्षमता (मे.टन.) | प्रस्तावित गोदामाची अंदाजपत्रकीय किंमत (₹) | सा.बां. विभागाच्या छाननी अंती किंमत (₹) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | भंडारा | लाखांदूर | लाखांदूर (जिरोबा) | ०६ | १८०० X ६ = १०८०० | २९,९६,३८,०० | २३,६१,६८,००० |
| **(अक्षरी रुपये:- तेवीस कोटी एकसष्ट लक्ष अडुसष्ट हजार फक्त)** | | | | | | | |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी प्राप्त झाल्यांनतर शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

५. काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी.

६. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामांचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकाम कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

७. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

८. सदर गोदामांचे बांधकाम प्रगतीपथावर असताना संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

९. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१०. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

११. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा यांनी घ्यावी.

१२. क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त अंदाजपत्रकाच्या छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने Recapitulation Sheet मध्ये सुधारणा केल्या आहेत. सदर Recapitulation Sheet व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीसंबंधी टिपणीच्या प्रती जिल्हाधिकारी व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना निर्गमित करावयाच्या प्रतीसोबत जोडली आहे.

१३. उपरोक्त खर्च **"मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८,०२, साठवण व वखार साठवण,१०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य्रक्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे"** या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

१४. सदरचे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक दि.२५.०९.२०१९ मधील तरतुदीनुसार मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेस

अनुसरुन व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५०६३८३ /इमा-१, दि.१४.१०.२०२० अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२७१५३३३२७६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2020.10.27 15:35:25 +05'30'

**( मनोजकुमार सूर्यवंशी )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, भंडारा.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, मुंबई व नागपूर.
३. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा), नागपूर.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, भंडारा.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय,मुंबई
१३. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-१), मंत्रालय, मुंबई.
१४. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५.
१५. निवड नस्ती/नापु-१६-ब.